उप जिल्हाधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांची बदलीने पदस्थापना...
छत्रपती संभाजीनगर

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन आदेश क्र. टिआरएफ-०७२४/प्र.क्र. १९१/ई-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: ०३ ऑगस्ट, २०२४

**संदर्भ:-**
१) महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५
२) सामान्य प्रशासन विभाग अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०२१/ प्र.क्र.४९/कार्या-१२, दि.१४.०७.२०२१

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) आणि ४ (५) मधील तरतुदींनुसार **उप जिल्हाधिकारी संवर्गातील खालील अधिका-यांच्या प्रशासकीय कारणास्तव/विनंतीनुसार** त्यांच्या नावासमोर स्तंभ क्र. ४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्यांचे नाव | कार्यरत पदस्थापना | बदलीनंतरची पदस्थापना |
|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. |
| १. | श्री. सचिन गिरी | उप विभागीय अधिकारी, बिलोली, जिल्हा नांदेड | सक्षम प्राधिकारी क्र. ५, झो.पु.यो., मुंबई (मालाड-२) येथे श्री. पवन चांडक यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| २. | श्री. सचिन खल्लाळ | उप विभागीय अधिकारी, बसमत, जिल्हा हिंगोली | उप विभागीय अधिकारी, नांदेड येथे श्री. विकास माने यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| ३. | श्री. विकास राजाराम माने | उप विभागीय अधिकारी, जिल्हा नांदेड | उप विभागीय अधिकारी, वसमत, हिंगोली येथे श्री. खल्लाळ यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| ४. | श्रीमती मनिषा दांडगे | उप विभागीय अधिकारी, परतुर, जिल्हा जालना | उप जिल्हाधिकारी (रोहयो) जालना येथे श्री. पदमाकर गायकवाड यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| ५. | श्री. पदमाकर गायकवाड | उप जिल्हाधिकारी (रोहयो), जिल्हा जालना | उप विभागीय अधिकारी, परतुर, जालना येथे श्रीमती मनिषा दांडगे यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| ६. | श्री. अनुप पाटील | विशेष भुसंपादन अधिकारी (लसिका), जिल्हा नांदेड | उप विभागीय अधिकारी, देगलुर जिल्हा नांदेड या रिक्त पदावर |

| | | | |
|---|---|---|---|
| ७. | श्री. अरुण ज-हाड | उप विभागीय अधिकारी, वैजापूर, जिल्हा छत्रपती संभाजीनगर | जिल्हा पुनर्वसन अधिकारी, जिल्हा जालना या रिक्त पदावर |
| ८. | श्री. प्रभोदय मुळे | उप जिल्हाधिकारी (सामान्य), जिल्हा छत्रपती संभाजीनगर | उप जिल्हाधिकारी (रोहयो), जिल्हा बीड येथे श्रीमती प्रियंका पाटील यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| ९. | श्रीमती क्रांती डोंबे | उप विभागीय अधिकारी, कळमनुरी जिल्हा हिंगोली | उप विभागीय अधिकारी, बिलोली, जिल्हा नांदेड येथे श्री. सचिन गिरी यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| १०. | श्री. उमाकांत सिताराम पारधी | उप विभागीय अधिकारी, जिल्हा हिंगोली | उप विभागीय अधिकारी, वैजापूर, जिल्हा छत्रपती संभाजीनगर येथे श्री. अरुण ज-हाड यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| ११. | श्री. समाधान घुटूकडे | उप जिल्हाधिकारी (सामान्य), जिल्हा हिंगोली | उप विभागीय अधिकारी, हिंगोली, जिल्हा हिंगोली येथे श्री. उमाकांत पारधी यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर |
| १२. | श्री. यशवंत माने | स्थावर व्यवस्थापक, शेती महामंडळ गंगापूर मळा, जिल्हा छत्रपती संभाजीनगर | उप विभागीय अधिकारी, हवेली, जिल्हा पुणे येथे श्री. संजय असवले यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदावर |

२. उपरोक्त अधिका-यांच्या बदलीने पदस्थापनेमुळे रिक्त झालेल्या पदांवर अन्य अधिका-यांच्या नियुक्तीचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील. तसेच, या आदेशामुळे नियुक्तीच्या प्रतिक्षेत राहणा-या अधिका-यांच्या पदस्थापनेबाबतचे आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील. शासन परिपत्रक, महसूल व वन विभाग, दि.०१.१२.२०२३ अन्वये, नियुक्तीच्या प्रतिक्षेतील अधिका-यांनी पुढील आदेशापर्यंत संबंधित विभागीय आयुक्तांकडे रुजू व्हावे.

३. **उपरोक्त अधिका-यांपैकी, जे अधिकारी निवडणुक कामकाजाकरीता अधिसुचित असलेल्या पदावर कार्यरत आहेत, त्या पदांवर नवीन अधिकारी कार्यभार घेईपर्यत बदली झालेल्या अधिका-यास कार्यमुक्त करण्यात येऊ नये.** सदर संबधित अधिकारी नवीन नियुक्तीच्या जागी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत e२.revenue@maharashtra.gov.in या ई-मेलद्वारे/ टपालाद्वारे शासनास त्वरित कळवावे.

४. संबंधित अधिकारी हे महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ च्या नियम १५ अन्वये विहित केलेल्या उक्त तरतूदींनुसार, पदग्रहण अवधी समाप्त होण्यापूर्वी बदलीच्या ठिकाणी रुजू झाले नसल्याचे निदर्शनास आल्यास, त्यांचेविरुद्ध लोकप्रतिनिधीत्व अधिनियम, १९५० व महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील तरतूदींनुसार शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

५. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळांतील प्रदाने) नियम, १९८१ मधील नियमांनुसार दिलेल्या विहित कालावधीत संबंधित अधिकारी यांनी पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्याची दक्षता घ्यावी. अन्यथा या पदस्थापनेच्या पदावर रुजू न झाल्यास, त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा "अकार्यदिन" (dies non) म्हणून गणला जाईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

६. संबंधित अधिकाऱ्यास शासनाच्या पूर्वपरवानगीशिवाय कोणत्याही कारणास्तव रजा मंजूर करू नये. तसेच, महाराष्ट्र नागरी सेवा (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार मूळ कार्यालयाने बदली झालेल्या अधिकाऱ्यांचे कोणत्याही प्रकारचे रजेचे अर्ज स्विकारु नयेत. असे अर्ज प्राप्त झाल्यास ते संबंधित अधिकाऱ्यांना मूळ पत्त्यावर नोंदणी पोच देय डाकेने परत करावेत.

७. सदरहू आदेशानुसार तात्काळ पदस्थापनेच्या पदावर रूजू न झाल्यास वा कोणत्याही प्रकारचा दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न झाल्यास, ही कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम २३ चे उल्लघंन करणारी असल्यामुळे, ती गैरवर्तणूक समजून त्यांचे विरुध्द शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल, याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

८. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२४०८०३२०२८४३२११९ असा आहे. हे शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VARUDKAR MAHESH ASHOKRAO

Digitally signed by VARUDKAR MAHESH ASHOKRAO
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=Revenue and Forest Department, 2.5.4.20=d93c4961d98086877a4048296211d7af97ecfd40d7967c43d20b360d83ce0fa6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7ebbbc3712e8d459ef90bf7aae4ea46e9caebdd50cfecde2ee7ce0454fa0416a, cn=VARUDKAR MAHESH ASHOKRAO
Date: 2024.08.03 20:43:55 +05'30'

**(महेश वरुडकर)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

**अपर मुख्य सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई**

**विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर**

**प्रत,**

- मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. उप मुख्यमंत्री (वित्त) यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- अपर मुख्य सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- विभागीय आयुक्त, सर्व
- संबंधित जिल्हाधिकारी.
- प्रधान महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
- संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
- संबंधित अधिदान व लेखा अधिकारी.
- संबंधित आहरण व संवितरण अधिकारी.
- संबंधित उप जिल्हाधिकारी (संबंधित विभागीय आयुक्त यांचेमार्फत).
- उप सचिव (ई-२) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
- निवडनस्ती ई- २